**मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, पुणे यांच्या आस्थापनेवरील ४ अस्थायी पदांना मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र.एमसीटी-१०१७/प्र.क्र.८९/परि-५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- १५ सप्टेंबर, २०२०.

**वाचा :-** १) शासन निर्णय, गृह विभाग क्र. एमसीटी १२७४/२-XXXV,(TR), दिनांक २०.०९.१९७६.
२) शा.नि.गृह विभाग क्र.एमसीटी/१७८/३ TRA-६, दि. ०७.०८.१९८०.
३) शा.नि.गृह विभाग क्र.एमसीटी/१८३/६(i)TRA-६, दि. १८.१०.१९८४.
४) शासन निर्णय, गृह विभाग क्र.एमसीटी-२०१७/प्र.क्र.८९/परि.५, दिनांक १५.०५.२०२०.
५) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दिनांक ३१.०८.२०२०.
६) सदस्य, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, पुणे यांचे पत्र क्र. जा.क्र.३४३/२०२०, दिनांक ०५.०९.२०२०.

**प्रस्तावना :-**

संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये पुणे येथे १ मोटार अपघात दावा न्यायाधिकरण स्थापन करण्यात आले असून संदर्भ क्र.२ व ३ येथील शासन निर्णयान्वये त्यांच्या आस्थापनेवर एकूण १३ पदे निर्माण करण्यात आली आहेत. त्यामध्ये ९ स्थायी व ४ अस्थायी पदे आहेत. सदर ४ अस्थायी पदांना संदर्भ क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये दिनांक ०१.०३.२०२० ते ३१.०८.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. सदर पदांना दिनांक ०१.०९.२०२० पासून पुढे मुदतवाढ देण्याबाबत सदस्य, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, पुणे यांनी संदर्भ क्र. ६ येथील पत्रान्वये शासनास विनंती केली आहे. सदर पदांना दिनांक ०१.०९.२०२० पासून पुढे मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, पुणे यांच्या आस्थापनेवरील खालील ४ अस्थायी पदांना दिनांक ०१.०९.२०२० ते २८.०२.२०२१ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे. सदर मुदतवाढ ही न्यायाधिकरणाकडे प्रलंबित असलेले दावे त्वरीत निकाली काढणे, निकाली काढलेल्या दाव्यांचे माहे नोव्हेंबर, २०२० व फेब्रुवारी, २०२० अखेरचे विवरणपत्र शासनास सादर करणे तसेच माहे ऑगस्ट, २०२० अखेर प्रलंबित असलेल्या दाव्यातील ५० टक्के दावे निकाली काढल्याचे दिसून न आल्यास पुढील मुदतवाढ मिळणार नाही, या अटीच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदाचे नांव | पद संख्या | पदे निर्माण केलेल्या शासन निर्णयाचा क्रमांक व दिनांक |
|---|---|---|---|
| १. | लिपिक-टंकलेखक | १ | शा.नि.गृह विभाग क्र.एमसीटी/१८३/६(i)TRA-६, दि. १८.१०.१९८४ |
| २. | टंकलेखक | १ | शा.नि.गृह विभाग क्र.एमसीटी/१८३/६(i)TRA-६, दि. १८.१०.१९८४ |

| | | | |
|---|---|---|---|
| ३. | बेलिफ | १ | शा.नि.गृह विभाग क्र.एमसीटी/१७८/३ TRA-६, दि. ०७.०८.१९८० |
| ४. | शिपाई | १ | शा.नि.गृह विभाग क्र.एमसीटी/१७८/३ TRA-६, दि. ०७.०८.१९८० |
| | एकूण | ४ | |

२. या बाबीवरील होणारा खर्च “मागणी क्र. बी-३, २०४१-वाहनांवरील कर, (००) ८००-इतर खर्च, (००) (०१)-मोटार अपघात दावा न्यायाधिकरण (२०४१ ०१२५)” या लेखाशिर्षाखालील सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा आदेश वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ३१.०८.२०२० अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०२००९१५१६५४४०३३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jaysen
Jayprakash Ingole

Digitally signed by Jaysen Jayprakash Ingole
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e1cc346c90ac68bdb6b1a84cb00c640524cb8ed1b6ae18a394fb20420edf51af, serialNumber=7c9e48ac69f313deeccd6e9eeceea57a822c9d8ccacd64dd1c5031b045e7c1f2, cn=Jaysen Jayprakash Ingole
Date: 2020.09.15 16:56:00 +05'30'

**( जयसेन जयप्रकाश इंगोले )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.अध्यक्ष, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण तथा विभाग प्रमुख, मुंबई.
२. मा. जिल्हा व सत्र न्यायाधिश, पुणे.
३. मा.सदस्य, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, पुणे.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
६. वित्त विभाग (व्यय-८/ वित्तीय सुधारणा/आ.पु.क.), मंत्रालय, मुंबई.
७. अवर सचिव/कक्ष अधिकारी, (बीयुडी-१/ परिवहन-४), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवड नस्ती / परिवहन-५